**संसदीय कार्य विभागासाठी खरेदी केलेल्या लॅपटॉप आणि प्रिंटर खरेदीच्या खर्चाच्या प्रदानास मंजूरी देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**संसदीय कार्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः यंत्रसा १५१६/प्र.क्र.६९/तीन**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: १९ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग३/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६

२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट २०१७

३) कार्यालयीन आदेश, संसदीय कार्य विभाग, क्रमांक राअभा ६०१८/ प्र.क्र.२/तीन दिनांक ३ ऑगस्ट २०१८

४) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, क्रमांक यंत्रसा १५१६/प्र.क्र.६९/तीन दिनांक १२ नोव्हेंबर २०१८

५) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग, कमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६५/दोन, दिनांक १५ जानेवारी २०१९

**प्रस्तावना :-**

संसदीय कार्य विभागाचे दैनंदिन कामकाज व विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाची तातडी विचारात घेऊन या विभागासाठी ५ संगणक, ४ प्रिंटर व २ लॅपटॉप खरेदी करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. त्यानुषंगाने, खरेदी प्रक्रिया पार पाडण्यासाठी शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलवर या विभागाची खरेदीदार विभाग म्हणून नोंदणी करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील आदेशान्वये विभागासाठी खरेदी अधिकारी तथा वस्तु ताब्यात घेणारा (Consignee) अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी व पडताळणी अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली आहे. संदर्भाधिन अनुक्रमांक ४ अनुसार या विभागासाठी संगणक, प्रिंटर्स आणि लॅपटॉप खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अशाप्रकारे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निश्चित केलेल्या धोरणाच्या अधीन राहून संसदीय कार्य विभागासाठी आवश्यक असलेल्या वर नमूद केलेल्या साहित्याची खरेदी प्रक्रिया पूर्ण करण्यात आली असून सदरहू खरेदीसाठी झालेल्या खर्चास व त्याच्या प्रदानास मंजूरी देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संसदीय कार्य विभागासाठी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलवरुन २ लॅपटॉप आणि १ मल्टिफंक्शन प्रिंटरची खरेदी करण्यात आली आहे. विभागाने २ लॅपटॉपची खरेदी स्पर्धात्मक

निविदेशिवाय ३ पुरवठादारांमध्ये तुलना करुन त्यातील निम्नतम दराने पुरवठा करणाऱ्या ARORA IT SOLUTION PRIVATE LIMITED, Delhi ११००८५ या पुरवठादारांकडून केली आहे. तसेच १ मल्टिफंक्शन प्रिंटर खरेदीसाठी Online Bidding पद्धतीचा अवलंब केला असून बिडींग मध्ये सर्वात कमी दराने पुरवठा करणाऱ्या (एल-१) SUN SYSTEMS, Delhi ११०००७५ या पुरवठादारांकडून प्रिंटरची खरेदी करण्यात आली आहे. यासाठी होणाऱ्या **एकूण रु. ८७,९८८/- (अक्षरी रुपये सत्त्याऐंशी हजार नऊशे अठ्ठयाऐंशी फक्त)** इतक्या रक्कमेच्या खर्चास व त्याच्या प्रदानास मंजूरी देण्यात येत आहे. सदर खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

| पुरवठादाराचे नाव | साहित्याचे नाव व वर्णन | देयक क्रमांक / इनव्हॉईस क्रमांक | दिनांक | रक्कम रुपये (जीएसटी सह) |
|---|---|---|---|---|
| ARORA IT SOLUTION PRIVATE LIMITED, Delhi 110085 | २ लॅपटॉप Laptop Dell Vostro 3568 i3 gen | ८४७ | ७ डिसेंबर २०१८ | ७२,९९८/- |
| SUN SYSTEMS, Delhi 110075 | १ मल्टिफंक्शन प्रिंटर Samsung Xpress SL-M2876ND Laser Multifunction Printer (SAMSUNG) | 428/SUN/18-19 | ५ डिसेंबर २०१८ | १४,९९०/- |
| **एकूण** | | | | **८७,९८८/-** |

२. प्रस्तुत लॅपटॉप व प्रिंटर यांची खरेदी माहिती व तंत्रज्ञान महामंडळ (माहिती व तंत्रज्ञान विभाग) यांनी मान्यता दिलेल्या स्पेसीफिकेशन प्रमाणे, तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४ ऑगस्ट २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

३. सदर खर्च ' मागणी क्रमांक - पी - १, मुख्यलेखाशिर्ष २०५२ - सचिवालय - सर्वसाधारण सेवा,०९० - सचिवालय, (००)(०१) संसदीय कार्य विभाग (अनिवार्य), संकेतांक (२०५२ ०२६८), १७, संगणक खर्च ' या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर खर्चाची रक्कम या विभागाच्या "आहरण व संवितरण अधिकारी, संसदीय कार्य विभाग" यांच्या नांवे इंडियन बँकेत असलेल्या खात्यामध्ये इलेक्ट्रॉनिक क्लिअरिंग सिस्टीम (ई.सी.एस.) द्वारे जमा करण्यात यावी. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर रकमेचे प्रदान पुरवठादारांना करावे.

५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक भाखंस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग - ४ दिनांक १ डिसेंबर २०१६ मधील परिच्छेद क्र ४.७ मध्ये नमूद केल्यानुसार माल स्वीकारताना दक्षता

घेण्यात आली आहे. तसेच जडवस्तु संग्रह नोंदवहीत नोंदही घेण्यात आली आहे. तसेच सदर अनुदानाचा विनियोग केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल व यापूर्वीचे कोणतेही उपयोगिता प्रमाणपत्र बाकी नसल्याचेही याद्वारे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३ / प्र.क्र.३० / १३ / विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग - पहिला, उपविभाग दोन खाली महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ च्या अनुक्रमांक २७-अ येथील नियम क्रमांक ७६ खाली प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२२१७०८३३२३१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sanjay Vasudeo Jadhav

Digitally signed by Sanjay Vasudeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46b3ee3c307381324abb3d60d1affb2c15ed046cf0907da3bfbb5f1f0dcd3cfe, serialNumber=bbde2a625f76bd7c322ce4089756d41f788d1ab32918ef26fc2d1560fb85949c, cn=Sanjay Vasudeo Jadhav
Date: 2019.01.22 17:13:24 +05'30'

**( सं.वा.जाधव )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (संसदीय कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य , (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
६. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा)मुंबई / नागपूर
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. उप सचिव, वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. आहरण व संवितरण अधिकारी, रोखशाखा, संसदीय कार्य विभाग मूळ देयकासह (दोन प्रती) त्यांना विनंती आहे की, त्यांनी सदर रकमेचे प्रदान वर नमूद पुरवठादारांना करण्यासाठी आवश्यक ती कार्यवाही करावी.
११. कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. निवडनस्ती.